**मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१८/प्र.क्र.३९६/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १० जानेवारी, २०१९

**वाचा :-** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.वनबां-२०१६/प्र.क्र.५/फ-९, दिनांक २६.१०.२०१६
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअ/लेखा/प्रक्र.१२१/११५५/२०१७-१८, दिनांक २१.०२.२०१८.

**प्रस्तावना:-**

मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २१.०९.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामास यापूर्वी रु.१६९५.३० लक्ष किंमतीस सचिव समितीची मान्यता देण्यात आली होती. सदर इमारतीचे प्राथमिक अंदाजपत्रक हे सन २०१४-१५ च्या दरसूचिवर आधारीत होते. तसेच सदर इमारतीच्या संरक्षण भिंतीमध्ये वाढ, पार्किंग क्षेत्रामध्ये वाढ व वस्तु व सेवा कर अंमलात आल्याने प्रकल्प किंमतीमध्ये वाढ होत असल्यामुळे संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी रु.२३७४.८४ लक्ष इतक्या रकमेचे सुधारित ढोबळ अंदाजपत्रक व नकाशे सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सादर केला होता.

सदर प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १५.११.२०१८ रोजी झालेल्या चर्चेनुसार सचिव समितीने मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामास रु.२०९९.५१ लक्ष किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता दर्शविलेली आहे. त्यानुसार मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामाच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १५.११.२०१८ रोजी झालेल्या सचिव समितीच्या बैठकीत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामात इमारतीच्या संरक्षण भिंतीमध्ये वाढ, पार्किंग क्षेत्रामध्ये वाढ व वस्तु व सेवा कर अंमलात आल्याने प्रकल्प किंमतीमध्ये वाढ होत असल्यामुळे रु.२०९९.५१ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सचिव समितीने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची सुधारित प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११०१६०१४०२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.10 16:10:50 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर
४. उपवनसंरक्षक (प्रा.), नागपूर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

“प्रपत्र-अ”

शासन निर्णय क्रमांक :-वनबां-२०१८/प्र.क्र.३९६/फ-९, दिनांक १०.०१.२०१९

| | | |
|---|---|---|
| Name of the Department :- Revenue and Forest Department | | |
| NAME OF WORK :- Construction of New Administrative Building (Vanbhavan) in the Premises of Chief Conservator of Forest (T.), Zero Mile, Nagpur | | |
| RECAPITULATION SHEET(For Reivised AA) | | |
| **S.N.** | **PARTICULARS OF ITEMS** | **Amount in Rs.** |
| (A) 1 | Cost of Construction | **13,24,24,970/-** |
| 2 | Electrification<br>Internal<br>External | <br>1,19,18,247/-<br>50,00,000/- |
| | **Total** | **1,69,18,247/-** |
| 3 | **Miscellaneous Items**<br>Compound Wall & Gate<br>Internal Roads<br>Furniture<br>Parking Arrangement<br>Rain Water Harvesting<br>Fire Fighting Arrangements etc.<br>Soil Investigations<br>Borewell<br>Quality Control Charges | <br>45,97,834/-<br>21,91,893/-<br>2,00,00,000/-<br>21,91,893/-<br>1,26,187/-<br>20,00,000/-<br>5,00,000/-<br>67,551/-<br>9,31,350/- |
| | **Total:-** | **3,26,06,708/-** |
| | **Sub Total (A) = (1) + (2) + (3):-** | **18,19,49,925/-** |
| (B)<br>1 | **OPTIONAL ITEMS**<br>Solar Energy System<br>Air Conditioning<br>Lifts<br>Architectural Services<br>External Toilets<br>Public Facility Center<br>NMC Approval<br>Dismantling<br>Green Building Concept | <br>5,00,000/-<br>1,00,00,000/-<br>60,00,000/-<br>10,00,000/-<br>11,54,085/-<br>4,31,772/-<br>10,00,000/-<br>6,18,892/-<br>20,00,000/- |
| | **Sub Total (B):-** | **2,27,04,749/-** |
| | **PROJECT (A) + (B) :-** | **20,46,54,674/-** |
| | **Add 4% for Contingencies on (1):-** | **52,96,999/-** |
| | **TOTAL COST OF Revised AA of PROJECT:-** | **20,99,51,673/-** |
| | **Say Rs. Lakhs:-** | **2,099.52** |

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.10 16:11:53 +05'30'

( सुजय दोडल )
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

******